

जय गजानन ५४

भगवान श्रीएकदंतांचे माहात्म्य तर मनोमन पक्के ठसले होते पण त्यांच्यापर्यंत जाण्यापूर्वी आधी त्या ईश्वरीशस्त्राला शांत करणे आवश्यक होते. तेथे प्रतिकार नव्हे तर नमस्कारच उपयोगी ठरणार होता. मदासुराने त्या परमदिव्य अस्त्राला प्रथम साष्टांग दण्डवत घातला आणि मग शरणागत भावाने त्या अस्त्राची स्तुती आरंभिली.

'हे ब्रह्ममयशस्त्रा, हे शस्त्रराजा, हे परशो तुज वंदन असो. हे तेज:पुञ्जमया कालकाला तुज नमन असो. भगवान श्रीएकदंतांची शक्ती असणाऱ्या स्वधर्मरक्षका तुज प्रणाम असो. मज शरणागताचे रक्षण कर. तू कालरूप आहेस: महाप्रलय सूचक वाटत आहेस. तुझ्या वेगाला सहन करणारी कोणती शक्ती जगात आहे? देहातीता तुला कोण देहधारी रोखू शकेल? अत: हे ज्योतिस्वरूपा, मी तुला वंदन करीत आहे. मी भयभीत झालो आहे. माझे रक्षण कर. तू शरणागत वत्सल आहेस. मला सांभाळ.' अशा शब्दांत मदासुराने त्या गाणेशी अस्त्राची स्तुती केली.

मदासुराच्या शरणागतीने कार्यभाग सफल झालेले ते गाणेशीअस्त्र शांत झाले आणि आपल्या मूळस्थानी भगवान श्रीएकदंतांच्या हातात परतले. अस्त्राचा तो अडसर एकदाचा दूर झाला आणि मग मदासुर भगवान श्रीगणनाथांच्या चरणी शरण झाला. प्रथम त्याने त्या मायापतीचे यथाशास्त्र पूजन केले. साष्टांग दण्डवत घातला आणि मग त्या वेदवंद्याची स्तुती आरंभिली.





'हे एकदंता, हे मायापते, हे ब्रह्ममया गणेशा तुज नमो नम:! मूषकारूढा, मूषकध्वजा, बंधहीना, सर्वव्यापिन् तुज वंदन असो. चतुर्भुजा, लंबोदरा, सुरूपा, नाभिशेषा हेरंबा, चिंतामणे तुज अभिवादन असो.'

एक शब्दाने निर्देशित होणारी माया, तिच्याद्वारे निर्मित जग हे तुझेच सगुण साकार रूप आहे अत: तुझे शरीर मानवाकृती आहे. मात्र त्या मायेचे अधिपती असणारे तुझे निर्गुण निराकार रूपच तुझी मूळ स्वरूपस्थिती आहे. अत: मानवाकृतीपेक्षा भिन्न तुझे मस्तक हे गजाकृती आहे. तू दोन्ही रूपात आहेस आणि दोन्हींच्या अतीत आहेस. तुला वंदन असो. हे गणनाथा, तुझे वर्णन करण्यास कोण समर्थ आहे! अत: अन्यमार्ग रहित असा मी तुला वारंवार वंदन करतो. हे शरणागत पालका, तुज वंदन असो. मजला सत्वर या संसार सागरातून तारून ने, असे म्हणून त्याने वारंवार नमस्कार घातले. प्रदक्षिणा केली आणि दोन्ही हातांची ओंजळ करून समोर शांत उभा राहिला.

अशा स्वरूपात मदासुराला अंतरी विकारहीन तथा भक्तिभावयुक्त झालेला पाहून श्रीगणनाथ प्रसन्न झाले आणि त्याला म्हणाले- हे दैत्यनायका! वास्तविक तुझ्या आजवरच्या अनेक अपराधांच्या दोषाने संतप्त होऊन तुला वधण्यार्थच आम्ही देवतांना दिलेल्या आशीर्वाद रूपात हा अवतार धारण केला होता. मात्र आता तू शरण आला आहेस. आता तुला आम्ही मारणार नाही.

स्वर्गात देवता, पृथ्वीवर मानव तथा पाताळात दैत्य आणि नाग अशी रचना ब्रह्मदेवांनी आमच्याच द्वारे प्राप्त सत्तेने निर्माण केली आहे. त्यामुळे ती तशीच चालू असणे आम्हास योग्य वाटते. मात्र कधी तरी देवता वा दैत्य या सीमांचे उल्लंघन करतात आणि मग शेवटी घडी ज्यावेळी अति विस्कटते त्यावेळी तिला व्यवस्थित करण्यासाठी आम्ही सगुण साकार रूप धारण करीत असतो. आता तू शरण आला आहेस. आम्ही तुला अभय देत आहोत. देवतांचे वैर सोडून दे. आपले मन अशा अत्याचारातून, आसुरी भावातून निवृत्त करून आमच्या भक्तीत लाव. आम्ही तुझ्या शरणागतीने प्रसन्न झालो आहोत. आता हवे ते वरदान माग. तुझ्या विनयाने आज आम्ही प्रसन्न झालो आहोत. तू रचलेले हे स्तोत्र आम्हास अतीव प्रिय ठरेल. जो हे स्तोत्र वाचेल अथवा भक्तिभावाने केवळ श्रवण करेल त्याच्या सर्व मनोकामना आम्ही पूर्ण करू.

मदासुराने वरदान रूपात केवळ एवढेच मागितले- 'हे दयाघना! जर प्रसन्न झाला आहेस तर पदकमलाची अखंड भक्ती प्रदान कर. हे भक्तवत्सला. शाश्वत प्रीती समर्पित कर. ज्या द्वारे अखंडरीत्या तव चरणाची सेवा करता येईल.'

**आसुरी भाव सोडलेल्या शांतरूप झालेल्या मदासुरास भगवान म्हणाले, हे असुरा, माझी भक्ती दृढ होऊन तू तरशील. जेथे माझे पूजन सुरू असेल. अन्य कार्यात आद्यपूजन**

**झालेले असेल, त्या कार्यात हे मदासुरा तू माझा भक्त रूपात शांतीचे राज्य स्थापन कर. मात्र जे या विपरीत वागतील, अर्थात गणेशपूजन, स्मरण रहित कार्ये करतील, त्या कार्याचे फळ तू भक्षण करीत जा. त्या कार्यात विघ्ने उत्पन्न करणे हेच तुझे कार्य असेल.**

भगवान श्रीसिद्धिबुद्धिपतींचे ते वचन मान्य करून असुरराज अवस्थेतून भक्तराज अवस्थेत परिणत झालेला मदासुर आपल्या नगरीत परत आला. गणेशभक्तीत रंगून गेला. त्याच्या या परिवर्तनानंतर जणू जीवनध्येय गमावल्याच्या दु:खात तारक, त्रिपुर इत्यादी असुर उद्विग्नपणे पाताळात परत गेले. देवतांना आपल्या स्थानी पुनश्च जाण्याची संधी मिळाली. त्रिभुवनाची असंतुलित अवस्था नष्ट होऊन सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली. भगवान श्रीएकदंताचा सर्वत्र जयजयकार होऊ लागला.



